**जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीच्या {Programme Implementation and Monitoring Committee }(PIMC) कार्यालयासाठी जागा उपलब्ध करुन देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्र.: अंश्रनि-२०२०/प्र.क्र.१८१/सामासु**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ०५ एप्रिल, २०२२

**वाचा:** १) महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समुळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३.

२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. अंश्रनि-२०२०/ प्र.क्र.१८१/सामासु, दि. २ मार्च, २०२२.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समुळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३, दि २० डिसेंबर, २०१३ रोजी जारी केलेला आहे. सदर कायद्याची परिणामकारक व योग्य अंमलबजावणी करण्यासाठी मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीची (Programme Implementation and Monitoring Committee PIMC) दि. २ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयान्वये पुनर्रचना करण्यात आलेली आहे.

जादुटोणा विरोधी कायदा प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्यस्तरीय कार्यालयाची आवश्यकता असल्याचे सह अध्यक्ष, जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती (PIMC) यांनी विनंती केली होती. त्यानुषंगाने राज्यस्तरीय PIMC कार्यालयासाठी सामाजिक न्याय विभागाच्या अधिनस्त ठाणे येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवनातील जागा वाटप करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय-**

जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीच्या (Programme Implementation and Monitoring Committee PIMC) कार्यालयासाठी डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन, ठाणे येथील पहिल्या मजल्यावरील ६५.०३ स्क्वेअर मीटर (७०० चौ.फूट) जागा वाटप करण्यात येत आहे.

२. सहायक आयुक्त, समाजकल्याण, ठाणे यांनी उपरोक्त जागेचा ताबा संबंधितांना द्यावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४१२१५३८०६४८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Rajesh Sadashiv Manjrekar

Digitally signed by Rajesh Sadashiv Manjrekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, serialNumber=7e57add6a85f0cf35923f0f015d8e4d4d3a72ec43ad6008f036a3ab06aa1bb85, cn=Rajesh Sadashiv Manjrekar
Date: 2022.04.12 15:39:57 +05'30'

**( राजेश स. मांजरेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहाय्यक
४) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) अप्पर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मुंबई
७) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
८) सर्व विभागीय आयुक्त
९) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) सर्व पोलीस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी/सहायक आयुक्त, समाजकल्याण
१६) सह अध्यक्ष, जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती
१७) सर्व संबंधित जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती सदस्य.
१८) निवड नस्ती, सामासु.